# आकलनाच्या नव्या तिळ्यावर

आसावरी काकडे



दृश्यं
जशीच्या तशी तर
उमटत नाहीतच छायाचित्रांत
पण उमटलेली दृश्यंही
वेगवेगळी दिसतात
वेगवेगळ्या नजरांना

कवितेच्या अर्थासारखी
ती पोहोचवतात
प्रत्येक पाहणाऱ्या नजरेला
आकलनाच्या नव्या तिठ्यावर ..!

# आकलनाच्या नव्या तिठ्यावर

छायाचित्र-कविता संग्रह

आसावरी काकडे

asavarikakade@gmail.com

9762209028 / 9421678480

www.asavarikakade.com.



## ई प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान

www.esahity.com

esahity@gmail.com

9869674820

पुनःप्रकाशन : १७ जुलै २०१५ (महाकवी कालिदास दिवस)

# सुधारित आवृत्तीसाठी मनोगत



२०११ साली या छायाचित्र-कवितांचे ई-पुस्तक ‘छायाचित्र चौकटी आणि दृश्यं’ या नावाने माझ्या भावाच्या मार्गदर्शनाखाली आम्ही घरीच तयार केले होते. काही रसिकांना या कवितासंग्रहाची लिन्क पाठवली. पुस्तक पाहून त्यांचे छान भरभरून अभिप्राय आले.

वेगळया निर्मितीचा आणि प्रतिसादाचा आनंद काही दिवस सुखावत राहिला. पण सगळे तेवढ्यावरच थांबले...

पुस्तक अधिक वाचकांपर्यंत जायला हवे होते असे वाटत राहिले. निर्मितीच्या दृष्टीनंही बरेच बदल करण्याची गरज वाटू लागली. दरम्यान ई साहित्य प्रतिष्ठानच्या या क्षेत्रातल्या कामाचा परिचय झाला. त्यांनी प्रकाशित केलेली, दर्जेदार निर्मिती असलेली पुस्तकं वाचनात आली. म्हणून त्यांच्याशी संपर्क साधला. त्यांना माझ्या पुस्तकाची लिन्क पाठवून हे पुस्तक नव्या रूपात प्रकाशित करता येईल का या संदर्भात विचारणा केली. सकारात्मक प्रतिसाद देत त्यांनी आता हे पुस्तक नव्या रूपात आपल्या समोर ठेवले आहे.

विशेष म्हणजे हे नवे रूप फक्त तांत्रिक दृष्ट्या सुधारलेले नाही. आधीच्या मुखपृष्ठाऐवजी या संग्रहातलाच एक फोटो वापरून अर्थपूर्ण मुखपृष्ठ तयार केले आहे. आणि आधीचे काहीसे गद्य शीर्षक बदलून यातल्याच कवितेतली एक ओळ ‘आकलनाच्या नव्या तिठ्यावर’ शीर्षक म्हणून वापरली आहे. नव्या रूपातले हे पुस्तक पाहताना, यातले जुन्या छोट्या मोबाइलवर चार-पाच वर्षांपूर्वी काढलेले फोटो बदलावेत का असं वाटून गेलं. पण जाणीवपूर्वक तेच फोटो ठेवले आहेत. कारण आधीच्या मनोगतात म्हटल्याप्रमाणे यातील फोटोंपेक्षा ते काढताना जाणवलेल्या अपुरेपणातूनच या कवितांची निर्मिती झालेली आहे..!

नव्या रूपातले हे पुस्तक ई साहित्य प्रतिष्ठानामार्फत आता अधिक वाचकांपर्यंत पोहोचेल याचा आनंद वाटतो. या नव्या निर्मितीबद्दल ई साहित्य प्रतिष्ठानचे श्री सुनिल सामंत, सचिन काकडे आणि संपूर्ण टीमचे अभिनंदन आणि मनःपूर्वक आभार.

आसावरी काकडे

६ जुलै २०१५

# मनोगत

छायाचित्र काढण्याची सुविधा असलेला मोबाईल भेट मिळाल्यावर भराभर फोटो काढायला सुरूवात झाली. हळू हळू नजर आजूबाजूच्या ‘दृश्यां’मधे छायाचित्रांच्या चौकटी ठेवून पाहायला लागली. छायाचित्र काढता काढता लक्षात येत गेलं की नजर जे अनुभवतेय त्यातलं फारच थोडं उतरतंय छायाचित्रात. जे हवं आहे त्याच्या बरोबर नको तेही येतंय अपरिहार्यपणे. जे येतंय तेही संकुचीत रूपात, रंग रूप बदलून येतंय. दोन दृश्यांमधलं अवकाश आक्रसून जातंय...

हे सर्व अनुभवताना आधी ‘चौकटीं’चं महत्त्व लक्षात आलं. मग हळू हळू मर्यादा जाणवू लागल्या. या मर्यादांनी ‘दृश्या’च्या असीम भव्यतेचं अवाक् करणारं भान दिलं आणि पाठोपाठ छायाचित्र टिपणाऱ्या नजरेचीच मर्यादा अधोरेखित केली... काय, किती, कसं पकडायचं छायाचित्रात हे ठरवता ठरवता लक्षात येत गेलं की ‘स्व’ची ही निवड ‘स्व’ची इयत्ता ठरवते आहे... छायाचित्र हेही स्वशोधाचं साधन होऊ शकतंय ! या नव्या माध्यमाची प्रत्यक्ष अनुभवातून ओळख होऊ लागली...

ही आंतरिक प्रक्रिया अनुभवताना एक दिवस शब्द सरसावले आणि हा अनुभव कविताबद्ध होऊ लागला...

वेगवेगळ्या तऱ्हेनं कवितांनी निरखलेला अनुभव आपल्यासमोर ठेवते आहे. एका छायाचित्रावर एक कविता लिहिली असं घडलं नाही. एकूण अनुभवानं जे जाणवून दिलं त्याचं प्रातिनिधिक रूप कवितांमधून व्यक्त होत गेलं... मी मोबाईलमधे काढलेल्या हजारो छायाचित्रांपैकी एकेक छायाचित्र, नमुना म्हणून एकेका कवितेसोबत देत आहे. काही जमलेली पण बरीचशी फसलेली ही छायाचित्रं... यांनी माझ्या समजुतीत भर घातली.

हा अनुभव तुमच्यापर्यंत पोचवण्याची ही कल्पना आणि तिची अंमलबजावणी मला मोबाईल भेट देणारा माझा भाऊ - केशव आपटे याची आहे. छायाचित्रं काढणं, कविता लिहिणं याच्या इतकाच या इ-पुस्तक निर्मितीचा अनुभव आनंद देणारा झाला. या आनंदात तुम्हालाही सहभागी होता येईल...

पहा आणि कळवा-

आसावरी काकडे - asavarikakade@gmail.com

०९४२१६७८४८०

*



छायाचित्र म्हणजे
अनंत काळाच्या प्रवाहातला
एक थेंब
चौकटीत पकडून ठेवणं !
थेंबातल्या
प्रतिबिंबात मावतं
तेवढंच उतरतं छायाचित्रात
पण केवळ
एक चौकट देऊन
पूर्णतेचा सुखावणारा अनुभव देतं ते
नजरेला आणि दृश्यालाही !

***

आसावरी काकडे

*



छायाचित्र पकडतं आपल्या
चौकटीत
कोणतंही दृश्य
आकाशातले आकर्षक विभ्रम
क्षितिजावरचा लाल-काळा
आंधारत जाणारा उजेड
झाडांचे विस्तार
बुंध्यांचे विलक्षण आकार
पाना-फुलांचे झुबके
फुलांतले पराग कण
उडती फुलपाखरं...उंच मीनार...डोंगररांगा
पक्षांच्या उड्डाणमुद्रा...
समुद्राचे नर्तन...समुद्रतळातले धन
रस्ते....उकीरडे....दलदल
क्रूर..निरागस चेहरे...
समोर येईल ते काहीही...

त्यामागची नजर ठरवते
काय घ्यायचं आत आणि
काय ठेवायचं चौकटी बाहेर !

***

आसावरी काकडे



तुम्ही काढू शकत नाही छायाचित्र
नुसत्या झाडाचं
त्याच्या पार्श्वभूमीशिवाय
उभं असतंच मागं
रंग बदलणारं आकाश
पण प्रत्येक झाडाला
पार्श्वभूमी म्हणून मिळेल तेच
हेही सांगता येत नाही
त्यांच्या मधे येतील
दुसरे मोठे वृक्ष किंवा इमारती
किंवा गंजक्या पत्र्यांची बसकी घरं
पडक्या भिंती...उकिरडे...बांधलेले पार
किंवा आणखी काही...

तुम्ही असा कितीही कुशल छायाचित्रकार
हव्या त्या झाडासाठी
तुम्हाला स्वीकारावी लागते
त्याच्या वाट्याला आलेली
पार्श्वभूमी सुध्दा !

***

आसावरी काकडे

*



पानांचा पूर्ण विस्तार
चौकटीबाहेर ठेवून
मी बुंध्यांच्या
चकित करणाऱ्या मुद्रा टिपल्या
छायाचित्रांमधे
आणखी जवळ जाऊन
निरखले त्यांतले
मौन पांघरलेले
चित्र-विचित्र चेहरे
वाचले त्यांचे मुळांशी आणि
आकाशाशी असलेले अनुबंध
जे छायाचित्रात उमटले नव्हते
आणि परतले घाईघाईनं
आणखी जवळ जायचं धाडस
मला झालं नाही !

***

आसावरी काकडे

*

नजर टिपत गेली
आधी पूर्ण वृक्ष
मग त्याची डौलदार फांदी
मग फांदीवरचं
दोन पानांत निरागसपणे उमललेलं फूल
पाकळ्यांचे रंग... रेषा रेषा
मग फुलातले नाजूक परागकण...
छायाचित्र थांबलं इथे
त्याला टिपता आला नाही गंध,
त्याची लवलव
किंवा फुलाच्या तळाशी असणारं
बी
ज्यातून उगवतो पुन्हा
पूर्ण वृक्ष !

***

आसावरी काकडे





*

पक्षी विहरत असतात आकाशात
थव्यानं झेपावतात इकडून तिकडे
आकाशपटलावर
सरकती नक्षी काढत !
नजर सरसावते
आकाशातल्या त्या नृत्यमुद्रा
टिपण्यासाठी
आतूर उत्सुकतेनं स्थिर करु लागते
छायाचित्राची चौकट
पण प्रत्येक वेळी
ते निसटून जातात तिच्यातून
वाऱ्याच्या झुळुकेसारखे
चौकटीत उरते फक्त रिकामे आकाश
प्रत्येक वेळी !
मग ती सोडून देते नाद
उडत्या पाखरांना
चौकटीत बंद करण्याचा आणि
हळूच उचलून घेते पापण्यांत
त्यांची मिटत जाणारी नक्षी
निष्फळ प्रयत्नांची साक्ष म्हणून !

***

आसावरी काकडे

*

दृश्यांचे
त्यांचे स्वत:चे आकार
त्यांचे स्वत:चे रंग
जसेच्या तसे
टिपता येत नाहीत छायाचित्रांमधे
कितीतरी तर राहतंच चौकटीबाहेर
पण चौकटीत येतं
तेही बदललेलं असतं केवढं तरी !
टिपणाऱ्या दृष्टीनुसार
चौकटीच्या क्षमतेनुसार
दृश्यांना जोजावणाऱ्या अंधार-उजेडानुसार
काल आणि अवकाशाच्या
टिपत्या संधी-क्षणानुसार
अनाकलनीयतेच्या मर्जीनुसार .......
कितीतरी बदलून गेलेली असतात
छायाचित्रं
जी जपून ठेवतो आपण
पाहिलेल्या.... अनुभवलेल्या
दृश्यांची स्मृती म्हणून !
***



आसावरी काकडे

*

दृश्यांचं
सत् रूप
उतरतच नाही
छायाचित्रांमधे
निसटत राहातं
चौकटींमधून
फुलांच्या गंधासारखं
पक्ष्यांच्या भिरभिरीसारखं
पाण्याच्या प्रवाहासारखं
शब्दाच्या अर्थासारखं...
ओंजळीतल्या तीर्थासारखं...
खरंतर
दृश्यं टिपणाऱ्या नजरेतूनच
निसटत असतं ते !



***

आसावरी काकडे

*

दृश्यं
स्विकारत नाहीत
छायाचित्रांची चौकट
बहुतेक वेळा

चौकटीबाहेर ठेवतात
आपला अथांग विस्तार
आणि चौकटीपुढे
फेकतात
आपलं रंग बदललेलं
संकुचित रुप !
***



आसावरी काकडे



*

दृश्यं हसत असतात
छायाचित्रांच्या
लहान-मोठ्या चौकटींना
ज्या पकडू पाहत असतात
आपल्या चिमटीत
समुद्राच्या लाटा
किंवा भिडवू पाहत असतात नजर
शेकडो प्रकाशवर्षे
दूरच्या आकाशाला
किंवा क्षितिजाच्या आभासाला
उगवत्या - मावळत्या सूर्याला
आणि मिरवत राहतात आनंद
त्यांच्या तुकड्यांना कवेत घेतल्याचा !

***

आसावरी काकडे



*

आरशात

प्रतिबिंबित होऊनही

बिंब राहावं जागच्या जागी

स्वगत हसत

तशी

दृश्यं हसत असतात

स्व-रुपांत

असंख्य चौकटींमधे

टिपली जाऊनही !

***

आसावरी काकडे



*

दृश्यं
जशीच्या तशी तर
उमटत नाहीतच छायाचित्रांत
पण उमटलेली दृश्यंही
वेगवेगळी दिसतात
वेगवेगळ्या नजरांना

कवितेच्या अर्थासारखी
ती पोचवतात
प्रत्येक पाहणाऱ्या नजरेला
आकलनाच्या नव्या तिठ्यावर !

***

आसावरी काकडे

*

चौकटी

निमूट नकलत नाहीत
समोरची दृश्यं
त्या देतात त्यांना
आपल्यातले काही रंग
आपलं अवकाश
आपलं आकलन .....
आणि
निगुतिनं कवेत घेऊन,
नामकरण करून
अलगद उतरवतात
त्यांच्यावरचा
असीमाचा भार !

***



आसावरी काकडे

*

चौकटी

नुसत्या टिपून घेत नाहीत
दृश्यं
त्यांना आसरा देतात
अर्थ देतात
त्यांच्यातलं सौंदर्य
अधोरेखित करतात
आणि
यच्च्ययावतातून वेगळं काढून
त्यांना त्यांचं
स्वतंत्र अस्तित्व बहाल करतात !

***

आसावरी काकडे





*

आपल्या असण्याचा
बांध घालून
चौकटी अडवतात
वाहून जाणारी दृश्यं
आणि
क्षितिजासारख्या उभ्या राहतात
दृश्यांच्या सीमेवर
त्यांना अबाधित राखण्यासाठी
त्या असतात तिथे
पण दिसत नाहीत
विसर्जित होत राहतात दृश्यांमधे
एकेका छायाचित्रासाठी !

***

आसावरी काकडे

*

चौकटी जतन करतात
विस्मृतीत गेलेले
युग-प्रवर्तक चेहरे
आठवण करुन देत राहतात
त्यांच्या एकेकाळच्या
प्रेरक अस्तित्वाची
हवी तेव्हा देतात सोबत हातांमधे
दूरदेशीच्या प्राणप्रियांची
किंवा काळाच्या पडद्याआड
गेलेल्या जीवलगांची .....!



चौकटी सांभाळत नाहीत नुसते चेहरे
त्यांच्या भोवतीच्या अवकाशात
असतात असंख्य अनुबंध
उलगडलेले
न उलगडलेले.. !

***

आसावरी काकडे

*
चौकटी शिताफीनं टिपतात
वरच्यावर
पानांच्या कुशीतली प्राजक्ताची
फुलं
गळायच्या आत
आणि
गुरुत्वाकर्षणाच्या विरोधात
रोखून धरतात
पाना-फुलांचा वियोग !
सतत गस्त घालत राहतात
त्या दृश्याभोवती
की कोमेजू नये
पाकळ्यांची शुभ्रता
मावळू नये
देठातली केशरी पहाट
तसाच साजरा होत राहावा
पूर्ण उमललेला क्षण !
***



आसावरी काकडे

*

चिरंजीव करु शकत नाहीत

चौकटी

पानाच्या टोकावरून

ओघळणाऱ्या

पावसाच्या थरथरत्या थेंबाला

पण तत्परतेनं टिपून

तिथल्या तिथे सावरतात

त्याला

आरपार होऊ देतात

उन्हाचे कवडसे

आणि

इंद्रधनूच्या शक्यतेसह

बहाल करतात

दीर्घायू

थोपवून धरतात त्याचे पतन

जिवात जीव असेपर्यंत !

***



आसावरी काकडे

*

नजरेला दिसतात
ते आकार
तसे रंग
टिपता टिपता
तारांबळ उडते चौकटीची

कधी नजर असते व्दिधा
कधी चौकट नसते स्थिरावलेली .....



दशदिशांना फाकलेली दृश्यं
पूर्णत्वानं टिपणं
अशक्यच
पण नजरेला अभिप्रेत दृश्यांशही
क्वचितच उतरतो छायाचित्रात

कविते सारखी फसतात बरेचदा
छायाचित्रंही !

***

आसावरी काकडे



*

नजरेला न विचारता
कधी कधी
चौकटी बोलतात थेट
दृश्यांशी
आणि
दृश्यंही स्वखुशीनं
खुलं करतात त्यांच्यासमोर
अंतरंग सौंदर्य...!
टिपला जातो
एक अद्भुत क्षण
नजरेला, चौकटिला किंवा
दृश्यालाही कळायच्या आत !

***

आसावरी काकडे

चौकटी टिपतात
पानांवरच्या रेषा
पानांच्या शिरा
पानांचे आकार वेगवेगळे
पानांचे रंग
पानांवरचा ऊन-सावलीचा खेळ
पानापानांमधलं अवकाश

चौकटी टिपतात
त्यांच कोवळं लाल-गुलाबी
तान्हुलेपण
पूर्ण वाढीचा क्षण
त्यांचं कुरतडलं जाणं
पिवळं पडणं.... आणि
ऋतुंच्या आदेशानुसार
निमूट गळून पडणंही !



चौकटी टिपतात
दृश्यांची सगळी अवस्थांतरं
दृश्याच्या बाहेर राहून
सारख्याच अलिप्तपणे !
***

आसावरी काकडे



*

चौकटी डोकावत नाहीत
कधी
कोणत्याच दृश्यामधे
निमुट उभ्या राहतात
काठावर
आपली भूमिका निभावत

दृश्यंही वाहत नाहीत
ओसंडून चौकटीबाहेर
लुकलुकत राहतात जागच्या जागी
छायाचित्रांच्या मर्यादेत !

भक्तांसाठी ईश्वरानं
स्विकारावी मूर्तीची मर्यादा
तशी !

***

आसावरी काकडे

*

नजरेची नजर चुकवून
चौकटी टिपून घेतात
कधी कधी
दृश्यांमधले रहस्यमय आकार
त्यांच्या आतल्या
अवकाशासह



स्थिरावू देतात त्यांना
स्वत:त निवांत
आणि विंगेत जाऊन
सादर करतात छायाचित्रं
रंगमंचावर

देतात
नजरेला आवाहन
आकारांना अर्थ देण्याचं !

***

आसावरी काकडे



*

कोट्यावधी रुपांत
विस्तारलेल्या विराट
दृश्यातील
एखादा लक्षांश
उचलून नेतात चौकटी
नजरेच्या आदेशानुसार
पण
विस्थापित झालेला
तो दृश्यांश
रुजत नाही नव्या जागेत कित्येकदा
मग आक्रसून घेतात त्या स्वत:ला
शून्यापर्यंत
आणि बंद पिंजऱ्याचं दार उघडून
सोडून द्यावा
आतला पक्षी अनंत अवकाशात
तसं मुक्त करतात दृश्याला
पुन्हा विराटात सामील होण्यासाठी !

***

आसावरी काकडे

*

टिपलेलं सर्वस्व
तत्क्षणी
छायाचित्रांना देऊन
रिकाम्या होतात चौकटी
आणि प्रतिक्षिप्तपणे
परततात स्वत:त

स्वस्थित चौकटींजवळ उरत नाही
काय काय टिपलं याची स्मृती
न त्या विषयीचा आनंद
न काही निसटल्याची खंत
त्यांना हावही नसते
नव्या छायाचित्राची
पण नजरेची हाक येताच
पुन्हा हजर होतात त्या
तिला हव्या त्या दृश्यासमोर !

त्या नसतात आसक्त
नसतात संन्यस्तही !



*** आसावरी काकडे

*

दृश्यं संपलेली नसतात
क्षितिजाच्या सीमेपाशी
त्याच्याही पार दूरदूरवर
फाकलेली असतात ती !
नजर थांबते
त्या आभासित
सीमेपाशी



तिला ओलांडता येत नाही
मृगजळ
मग ती टिपते त्याचं
छायाचित्र
आणि त्याच्या काठावरून
डोकावत राहते
शोधत राहते
सीमेपार फाकलेली दृश्यं  !

***

आसावरी काकडे



*

शब्दांनी खेळावं
आशयाशी
आणि
आशय व्यक्त करून
परतावं परत भाषेत
तशा
चौकटी खेळतात
दृश्यांशी
आणि विरुन जातात
निराकारात
छायाचित्र टिपून झाल्यावर !

***

आसावरी काकडे

*

आधी नजर हेरते
दृश्यांमधल्या
प्रार्थना.... तांडव.... शृंगार
असंख्य अनाम विभ्रम
त्यातल्या नृत्यमुद्रा



मग चौकटी टिपून घेतात
एकेक निष्ठापूर्वक
आणि सादर करतात
तिच्यासमोर
टिपलेले सर्व क्षण

नजर निरखत राहते
पुन्हा पुन्हा
एकेक छायाचित्र
कुतुहलानं
स्वत:चं प्रतिबिंब
पाहत असल्यासारखी !

***

आसावरी काकडे

*

कवितेनं पारखून घ्यावा
भाषेच्या अवाढव्य पसाऱ्यातून
हवा असलेला अंतस्थ शब्द
तशी नजर वेचून घेते
चपखल चौकटी

डोकावत राहाते पुन्हा पुन्हा
एकेका चौकटीतून
हवी ती रंगच्छटा मिळेपर्यंत
हवं ते रूप दिसेपर्यंत

काय कसं किती हवं ते
शोधता शोधता
स्व-शोधाच्या वाटेवर
चालायला लागलेली असते ती !

***



आसावरी काकडे



*

झाडावरून
पायदळी गळून पडणाऱ्या
प्राजक्ताच्या नाजूक फुलांना
अलगद झेलून वरचेवर
जवळच उभ्या असलेल्या
झाडानं आपल्या ओटीत घेतलं

हळवेपणानं
निरखलं क्षणभर ते दृश्य

आणि टिपलं छायाचित्र
अनोळखी पानाच्या मांडीवर
खेळणाऱ्या प्राजक्त-फुलांचं !

एका अनोख्या दत्तक-सोहळ्याचा क्षण
चौकटीत बंद केला
केव्हाही उघडून अनुभवता यावा म्हणून !
***

आसावरी काकडे

*

दृश्यं देतात दर्शन
आर्त जिज्ञासू नजरेला
हवं त्या रूपात
तिची उत्कंठा शिगेला पोचल्यावर
आणि तृप्त नजरेचं बोट धरून
घेऊन जातात तिला
तिच्या परिघाबाहेर
दाखवतात
नवं तपोवन
नवं अवकाश
नवं क्षितिज...
अवाक् होऊन पाहातच
राहाते ती
त्या विराटाकडे
स्तब्ध... अंतर्मुख
मर्यादांच भान आलेल्या
चौकटी मिटवून !



***

आसावरी काकडे



*

छायाचित्र आक्रसून टाकतं
दोन दृश्यांमधलं
अर्थपूर्ण अवकाश
खुज्या करून टाकतं
दृश्यांच्या त्रिमिती
आपल्या लांबी-रूंदीच्या
मगदुराप्रमाणे
सांभाळतं ते
मधल्या अंतरांचे आभास
आणि नजरेवर सोपवून देतं
जबाबदारी
मूळ दृश्य मूळ रूपात
मनःपटलावर साकारण्याची !

***

आसावरी काकडे

*

खिडकीतून दिसणाऱ्या
त्या तारेवर लटकलेल्या
पावसाच्या थेंबांचं छायाचित्र काढायचंय
टिपायचीय त्यात डोकावणाऱ्या
आकाशाची चमक
पण पलीकडली झाडं... इमारती
मधलं अवकाश ओलांडून
पुढे येतायत... आणि
अलिकडच्या खिडकीचे गज
दृश्यावर फुली मारल्यासारखे
मधे येतायत...
कबुतरं नाचून
सांडवतायत तारेवरचे थेंब
...इतक्यात ऊन पडलं तर
सुकून जातील उरले सुरले
त्याच्या आत टिपायला हवेत ते !
पण चौकटींना
बाजूला सारता येत नाहीय अल्याड
की रोखता येत नाहीय पल्याड...!!



*** आसावरी काकडे

*

एकेका क्लिकमधे पकडून ठेवलेली
अभ्रांकित... रंगीबेरंगी
शांत... उधळलेली
दीपवणारी... ओथंबलेली
मोहक... घाबरवणारी
नवनवोन्मेषशाली
सातशे चाळीस आकाशं
शेकडो फुलं... पानं
रंग.. आकार.. अवकाश
असंख्य मुद्रांमधले
संचित-संपृक्त झाडांचे बुंधे
पक्षी.. प्राणी.. माणसं...
जिवलगांच्या भेटींची चलचित्रं... गाणी
आणि
या सगळ्यांशी निगडित
कैक स्मृती...!

इतकं सगळं
केवळ एक जीबी स्पेसमधे

एका अद्‌भुत लिपीमधे
अनुवादित होऊन
अदृश्य होऊन बसतं !
त्यातलं कोणतंही आकाश
कोणतंही झाड.. पान.. फूल..
कोणताही पक्षी.. प्राणी.. जिवलग
हवं तेव्हा हवं ते ते
समोर दृश्यमान होतं
पुन्हा एकेका क्लिकनंतर

आणि नकोसं झाल्यावर
एका आदेशासरशी
सगळंच्या सगळं कायमचं
डिलीट होऊन जातं विनातक्रार
एक जीबी स्पेसला
साधा ओरखडाही न उमटवता !

आसावरी काकडे
**09421678480**
**asavarikakade@gmail.com**

# ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठान हा अनेक कवी व लेखकांनी सुरू केलेला एक नवीन प्रयोग. मराठी मध्ये वाचक आणि साहित्यिक अधिक जवळ यावेत आणि एक मोठी चळवळ इंटरनेटच्या माध्यमातून सुरू व्हावी अशी इच्छा होती. हिंमते मर्दा. मददे खुदा. किंवा हल्लीच्या भाषेत सांगायचं तर सच्ची लगन हो तो अपने सपने हासिल करनेके लिये सारी कायनात एक हो जाती है. मराठी भाषेत उत्तम दर्जेदार साहित्य निर्मिती व्हावी, चांगले वाचक एकत्र यावेत, त्यांना चांगल्या दर्जाचे साहित्य मिळावे आणि दर्जेदार लिहू इच्छिणाऱ्या लेखकांना असे वाचक मिळावेत. एवढेच काय ते आमचे छोटेसे स्वप्न. या आमच्या छोट्याशा स्वप्नाला लाखो वाचकांची साथ मिळत गेली आणि कारवां बनता गया. आज आमच्या या चळवळीला आसावरी काकडेंसारख्या मोठ्या कवयित्रीचा आशीर्वाद लाभत आहे ही आमच्यासाठी अभिमानाची गोष्ट आहे. त्यांनी आशीर्वाद म्हणून हा कवितासंग्रह विनामूल्य वितरणासाठी बहाल केला आहे. आम्हाला याचा प्रचंड आनंद आहे.

पण आम्ही समाधानी नाही. बारा कोटींच्या या मराठी समाजात किमान एक दोन कोटी तरी समंजस, चोखंदळ वाचक असायला हवेत. ज्ञानोबा तुकोबांच्या संस्कारांत वाढलेल्या या समाजाकडून एवढी अपेक्षा ठेवायला काय हरकत आहे? मित्रहो. ज्योतीने ज्योत तेवत जावी. तसे वाचकांनीच वाचक जोडायला हवेत. तुम्हाला जर हे स्वप्न पूर्ण होण्यात हातभार लावावासा वाटत असेल तर फक्त एवढेच करा. आपल्या ओळखीपाळखीतल्या किमान दहावीस लोकांचे ई मेल पत्ते आम्हाला कळवा.

असे ई मेल आय डी पाठवणाऱ्या वाचकांना आम्ही VIP वाचक दर्जा देतो.

आमचा पत्ता : esahity@gmail.com

अधिक माहितीसाठी भेट द्या : www.esahity.com

आपले नम्र
टीम ई साहित्य